**कृषि प्रक्रिया सहकारी संस्था- राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना सन २०१९-२० पर्यंतच्या कर्जाची मुद्दल व त्यावरील व्याजासह परतफेड सन २०२०-२१ च्या मंजूर अनुदानातून करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.३६/१-स**

नवीन प्रशासकीय इमारत, १४ वा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०२ सप्टेंबर, २०२०

वाचा:-

१) या विभागाचा शासन निर्णय क्र.प्रक्रिया ११२००४/प्र.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.०५.२०१६

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.०४.२०२०

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२०

५) उप निदेशक (वित्त), रा.स.वि.नि., नवी दिल्ली यांचे क्र.,NCDC-A&C/IX(१)/REP/०९/१७९५, दि.१९.०६.२०२०

**प्रस्तावना:-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागांतर्गत (पणन) राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनांतर्गत राज्य शासन कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना प्रकल्पांच्या उभारणीकरिता विहीत केलेल्या आकृतीबंधानुसार/योजनेच्या मंजूर वित्तीय आराखड्यानुसार शासकीय भागभांडवल तसेच कर्ज उपलब्ध करुन देते. राष्ट्रीय सहकार विकास निगमामार्फत या योजनेअंतर्गत राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. सन २०१९-२० पर्यंत राज्य शासनास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केलेल्या कर्जापैकी, परतफेडीकरिता पात्र कर्जातील मुद्दलाची व मंजूर कर्जावरील व्याजाच्या देय हप्त्यांची परतफेड करण्याकरिता रा.स.वि.नि.ने संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१९.०६.२०२० रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास सुचित केले आहे. सदर पत्रानुसार सन २०१९-२० पर्यंत राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या, कर्जापैकी मुद्दल रु.२,४५,०१,५००/- व व्याज रु.१,३९,६३,४९२/- असे एकूण रु.३,८४,६४,९९२/- एवढी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने अदा करण्याची विनंती शासनास केली आहे. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने प्रस्तावित केल्यानुसार दि.२०.०९.२०२० पूर्वी रक्कम अदा केल्यास व्याजावर रु.१२,३१,५५८/- इतक्या रकमेची सूट (Rebate) मिळणार आहे. म्हणजेच रु.२,४५,०१,५००/- मुद्दल व रु.१,२७,३१,९३४/- इतकी व्याजाची रक्कम अशी एकूण रु.३,७२,३३,४३४/- इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला दि.२०.०९.२०२० पर्यंत अदा करणे आवश्यक आहे. त्यास अनुसरून रु.३,७२,३३,४३४/-

(कर्जाची मुद्दल रु.२,४५,०१,५००/- + व्याज रु.१,२७,३१,९३४/-) इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

२. कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाची दक्षता या विषयाबाबत दि.१०.५.२०१६ रोजी वित्त विभागाने परिपत्रक निर्गमित केले असून, त्या अनुषंगाने या प्रस्तावासंबंधी माहिती खालीलप्रमाणे आहे: -

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार**-वित्त विभाग परिपत्रक दि.१६.०४.२०२० अन्वये "४५-व्याज " व "५६- कर्जाची परतफेड" या बाबीखाली निधी खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त आहेत.

२) **मंजूर निधी** : - सन २०२०-२१ या वर्षात कर्जाच्या मुद्दलाची परतफेड करण्यासाठी (६००३००४५८) या लेखाशिर्षाखाली रु.८,६७,००,०००/- व व्याजासाठी (२०४९२७११) या लेखाशिर्षाखाली रू. २,९५,००,०००/- इतक्या रकमेची तरतूद करण्यात आलेली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी सदर लेखाशिर्षातर्गत कोणताही खर्च झालेला नाही.

४) विचाराधीन लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) ५ ते ९ येथील नमूद बाबी सदर प्रकरणी लागू नाहीत.

राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना रु.३,७२,३३,४३४/- (रूपये तीन कोटी बाहत्तर लक्ष तेहत्तीस हजार चारशे चौत्तीस फक्त) इतकी रक्कम अदा करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे: -

<u>शासन निर्णय : -</u>

राज्यातील सहकार विकासाकरिता राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी पणन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सहकारी कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना अर्थसहाय्याकरिता राज्य शासनास कर्ज मंजूर केले होते. सदरच्या कर्जाची मुद्दल **रु.२,४५,०१,५००/- (रुपये दोन कोटी पंचेचाळीस लक्ष एक हजार पाचशे फक्त)** व त्यावरील व्याजाची रक्कम **रु.१,२७,३१,९३४/- (रुपये एक कोटी सत्तावीस लक्ष एकतीस हजार नऊशे चौतीस फक्त)** अशी एकूण **रु.३,७२,३३,४३४/- (रुपये तीन कोटी बाहत्तर लक्ष तेहत्तीस हजार चारशे चौतीस फक्त)** इतकी रक्कम सन २०१९-२० पर्यंत परतफेडीच्या हप्त्यापोटी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च चालू आर्थिक वर्षात (२०२०-२१) खालील लेखाशिर्षांतर्गत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**कर्ज**- रु.२,४५,०१,५००/- (रुपये दोन कोटी पंचेचाळीस लक्ष एक हजार पाचशे फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-४**
मुख्य लेखाशिर्ष
६००३ राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण

(१०८) राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
(००)(०२) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे (पणन)(अनिवार्य) भारित
(६००३ ०४५८)
भारित-५६ कर्जाची परतफेड

**व्याज**-रु. १,२७,३१,९३४/- (रुपये एक कोटी सत्तावीस लक्ष एकतीस हजार नऊशे चौतीस फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-१**
मुख्य लेखाशिर्ष
२०४९ व्याज प्रदाने
०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज
२०० देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज
०२ कर्जावरील व्याज
(०२)(०७) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज (पणन) (अनिवार्य)
(२०४९ २७११)
भारित-४५, व्याज

**३.** राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना मंजूर केलेली उपरोल्लिखित रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला त्याचे वितरण करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, श्री.का.गो.वळवी, उप सचिव (१-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** उपरोल्लेखित रक्कम RTGS सुविधेद्वारे राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना अदा करावयाची असून त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे-

| | |
|---|---|
| Name of the account | National Cooperative Development Corporation |
| Name of the Bank | State Bank of India |
| Name of the Branch | Commercial Branch, Nehru Place, Delhi |
| Account No. | ३२१६४०५२८७४ |
| IFSC Code | SBIN ०००४२९८ |

**५.** राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याची पोच महाराष्ट्र शासनास नोंदणीकृत डाकेने/ई-मेलद्वारे मुद्रांकित पावती पाठवावी.

६. संदर्भाधीन क्र.३ येथील वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० च्या परिपत्रकातील अटींची तसेच, परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील प्रस्तावाला लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे (परिशिष्टातील अनुक्रमांक ८ येथील अट वगळून) प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२४०/व्यय-२, दि.२१.०८.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९०२१६२२०७४८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramdas Girjappa Kolekar

Digitally signed by Ramdas Girjappa Kolekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-Operation Marketing & Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3c1515c8b62a890dca3c9160e8db8794b6f72df92cfc3eb5ec182e5e22c68662, cn=Ramdas Girjappa Kolekar
Date: 2020.09.02 16:29:10 +05'30'

**( रामदास कोळेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान सचिव/सचिव, (सहकार/पणन/वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२) उप सचिव (अर्थसंकल्प/पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अवर सचिव/कक्ष अधिकारी,( ९स,११स,१६ स, १७ स,२१स,२४स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (रोखशाखा) तथा आहरण व संवितरण अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५) कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
१०) पणन संचालक, पणन संचालनालय,महाराष्ट्र राज्य पुणे
११) सह संचालक, लेखा व कोषागरे (संगणक शाखा) नवीन प्रशासन भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.
१२) संचालक/उप निर्देशक (वित्त),राष्ट्रीय सहकार विकास निगम,४ सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौजखास, नवी दिल्ली ११०००१.
१३) प्रादेशिक उपसंचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५ बी.जे.रोड, पुणे.
१४) निवडनस्ती (१-स).